**जलसंपदा विभागांतर्गत गट-क व गट ड मधील रिक्त पदे भरण्याबाबत..**

महाराष्ट्र शासन
जलसंपदा विभाग,
शासन निर्णय क्रमांक संकीर्ण-२०११/( ३६३/२०११) आ(अतांत्रिक),
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : २४/०८/२०११.

वाचा : १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक एसआरव्ही-२००६/ प्र.क्र.९४/०६/१२, दिनांक : १३.७.२००७.
२) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक प्रानिमं-२००७/प्र.क्र.४६/ ०६/१३-अ, दिनांक १९.१०.२००७.
३) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक एसआरव्ही-२००७/ प्र.क्र.१९९/०७/१२, दिनांक :१७.११.२००७.
४) जलसंपदा विभाग, शासन परिपत्रक क्रमांक: संकीर्ण-१००७/ (४२१/२००७) आ.(अतांत्रिक), दिनांक : २३.११.२००७.
५) सामान्य प्रशासन विभागाचे पत्र क्रमांक प्रानिमं-१००७/प्र.क्र.८१/ ०७/१३-अ, दिनांक : ०६.१२.२००७.
६) जलसंपदा विभाग, शासन परिपत्रक क्रमांक संकीर्ण-१००७/ (४२१/२००७)सु.धा./आ.(अतांत्रिक), दिनांक : १५.०२.२००८.
७) जलसंपदा विभाग, शासन परिपत्रक क्रमांक संकीर्ण-१००७/ (४२१/२००७)सु.धा./आ.(अतांत्रिक), दिनांक : ०४.०३.२००८.
८) जलसंपदा विभाग, शासन निर्णय क्रमांक संकीर्ण-२००८/ (१६०/२००८) आ.(अतांत्रिक), दिनांक : २४.०३.२००८.
९) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक: बीसीसी-२०११/ प्र.क्र.८६/२०११/१६-ब, दिनांक ०२.०८.२०११.

**प्रस्तावना :-**

शासन सेवेतील रिक्त पदे भरण्याबाबत आवश्यक कार्यवाही करण्याच्या अनुषंगाने विविध सूचना संदर्भाधिन शासन निर्णय व परिपत्रकान्वये वेळोवेळी सर्व विभागाना/कार्यालयाना देण्यात आलेल्या आहेत. जलसंपदा विभागातील गट क व गट ड संवर्गातील रिक्त पदे भरण्याबाबत करावयाच्या कार्यवाहीबाबत संदर्भाधीन शासन निर्णय अनुक्रमे अनुक्रमांक ६, ७ व ८ अन्वये सविस्तर सूचना निर्गमित करण्यात आलेल्या आहेत. प्रस्तुत शासन निर्णया अन्वये सन २००८ मध्ये जलसंपदा विभागात गट क व गट ड संवर्गातील सरळ सेवेची रिक्त पदे भरण्याची कार्यवाही क्षेत्रीय स्तरावर पूर्ण करण्यात आली आहे. उपरोक्त संदर्भाधीन अनुक्रमांक ८ च्या शासन निर्णयामध्ये सरळसेवेच्या कोटयातील रिक्त पदे भरण्याबाबतची कार्यवाही दिनांक १६.०५.२००८ पूर्वी पूर्ण करावयाची होती. सबब त्या शासन निर्णयान्वये गठीत केलेल्या मुख्य अभियंता यांच्या अध्यक्षतेखाली प्रादेशिक निवड समितीच्या कार्यकाल बाबत वारंवार क्षेत्रिय

स्तरावरुन विचारणा होत होती. या सर्व बाबींचा विचार करून विभागातील गट क व ड संवर्गातील रिक्त पदे भरण्याबाबत निर्णय घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

जलसंपदा विभाग, शासन निर्णय, दिनांक २४.०३.२००८ अन्वये गठित केलेल्या प्रादेशिक निवड समित्यांची खालीलप्रमाणे पुनर्रचना करण्यात येत आहे. सदर प्रादेशिक निवड समित्या शासनाचे पुढील आदेश होईपर्यंत कार्यरत राहतील.

| अ.क्र. | समन्वयक मुख्य अभियंता/ प्रादेशिक निवड समिती अध्यक्ष | समन्वयासाठी जिल्हे |
|---|---|---|
| १ | मुख्य अभियंता (वि.प्र.)पुणे | पुणे,सातारा,सांगली,कोल्हापूर, सोलापूर. |
| २ | मुख्य अभियंता व मुख्य प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, औरंगाबाद. | औरंगाबाद, जालना, परभणी, हिंगोली, नांदेड, लातूर, बीड, उस्मानाबाद. |
| ३ | मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, उत्तर महाराष्ट्र प्रदेश, नाशिक | नाशिक, अहमदनगर, जळगांव, धुळे व नंदुरबार. |
| ४ | मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, अमरावती. | अमरावती, अकोला, वाशिम, बुलढाणा व यवतमाळ. |
| ५ | मुख्य अभियंता, गोसीखुर्द प्रकल्प, नागपूर. | नागपूर, वर्धा, भंडारा, गोंदिया, चंद्रपूर व गडचिरोली. |
| ६ | मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई. | ठाणे, रायगड, रत्नागिरी व सिंधुदूर्ग. |

२. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, दि.२.८.२०११ अन्वये मागासवर्गीय अनुशेषाची पदे दिनांक ३१.०३.२०१२ अखेर भरण्याची कार्यवाही करण्याबाबतच्या सूचना मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन यांनी दिलेल्या आहेत. त्याअनुषंगाने गट क व ड संवर्गातील दि. ३१.३.२०११ अखेरची मागासवर्गीय अनुशेषाची पदे प्राधम्यक्रमाने भरावयाची आहेत. त्यानुसार संबंधित मंडळ कार्यालयानी त्याच्याकडील मागासवर्गीय अनुशेषाची रिक्त पदांची संख्या बिंदुनामावली प्रमाणे निश्चित करुन त्याप्रमाणे मागणीपत्रे परिमंडळ कार्यालयास तात्काळ सादर करावीत. मुख्य अभियंता यांच्या अध्यक्षतेखालील गठीत केलेल्या प्रादेशिक निवड समितीकडे परिमंडळानी आपल्या अखत्यारीतील मंडळ कार्यालयातील मागासवर्गीय अनुशेषाच्या रिक्त पदांची संकलित माहिती तात्काळ सादर करावी.

३. सन २००८ मध्ये झालेल्या सरळ सेवा भरतीचे वेळी मुलाखतीपूर्वी अर्हता विषयक कागदपत्रांची योग्य छाननी न केल्याने अनेक न्यायालयीन प्रकरणास शासनास सामोरे जावे लागले. तसेच अनेक निर्णय शासनाच्या विरोधात गेले. हा पूर्वानुभव लक्षात घेता प्रादेशिक निवड समितीने मुलाखतीसाठी पात्र उमेदवारांची यादी प्राप्त झाल्यानंतर कार्यकारी अभियंता यांच्या नेतृत्वाखाली अनुभवी दोन ते तीन कर्मचा-यांनी मुलाखतीस पात्र उमेदवारांच्या प्रस्तुत पदाच्या सेवा प्रवेश नियमान्वये कागदपत्रांची छाननी करणे अनिवार्य राहील. प्रादेशिक निवड समितीने उमेदवारांची अंतिम निवड केल्यानंतर त्याची शिफारस संबंधित मंडळाकडे करावी.

नियुक्ती प्राधिकारी या नात्याने मंडळाच्या अधिक्षक अभियंता यांनी पात्र उमेदवारांना नियुक्ती देण्याबाबतचे सविस्तर आदेश काढुन पुढील कार्यवाही करावयाची आहे.

४. गट ड प्रवर्गातील रिक्त पदे भरण्यासाठी उपरोक्त संदर्भ क्रमांक ६ व ७ अन्वये सविस्तर सूचना निर्गमित केल्या आहेत. प्रस्तुत परिपत्रकात नमुद केल्याप्रमाणे जिल्हानिहाय नियंत्रक अधिक्षक अभियंता यांनी तात्काळ मागासवर्गीय अनुशेषाची गट ड संवर्गातील रिक्त पदे भरण्यासाठी आवश्यक ती प्रक्रिया सुरु करावी. यासंदर्भात काही ठिकाणी प्रशासकीय सोयीसाठी नियंत्रक अधीक्षक अभियंता बदलणे आवश्यक असल्यास त्यामध्ये बदल करण्याचे अधिकार त्या कार्यक्षेत्रातील समन्वय मुख्य अभियंता यांना राहतील. त्याप्रमाणे कार्यवाही करुन शासनास समन्वय मुख्य अभियंता यांनी अवगत करावे.

५. गट क संवर्गातील मागासवर्गीय अनुशेषाची रिक्त पदे भरण्याची संपूर्ण कार्यवाही प्रादेशिक निवड समितीने पूर्ण करावी, व गट ड संवर्गातील अनुशेषाची रिक्त पदे भरण्याची संपूर्ण कार्यवाही नियंत्रक अधिक्षक अभियंता यांनी पूर्ण करावी. याव्यतिरिक्त उपरोक्त संदर्भ क्रमांक ६, ७ व ८ मधील तरतुदी कायम राहतील.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक 201108246115300 असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( अ. अ. कोदे )
शासनाचे उप सचिव

प्रत,

सचिव (जलसंपदा) जलसंपदा विभाग, मंत्रालय.

सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय.

सर्व कार्यकारी संचालक, जलसंपदा विभाग

सर्व समन्वय मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग.

सर्व नियंत्रक अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग,

इतर मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग.

सर्व अधीक्षक अभियंता व परिमंडळीय अधिकारी, जलसंपदा विभाग.

सर्व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग,

सर्व कार्यकारी अभियंता, जलसंपदा विभाग.

निवडनस्ती.

आ (अतांत्रिक) संग्रहार्थ.